न्यायालयीन कामकाजामध्ये दाखल करण्यात येणारी शपथपत्रे वरीष्ठ अधिकाऱ्यांच्या स्वाक्षरीने दाखल करण्याबाबत.

**महाराष्ट्र शासन**
**गृह विभाग**
**शासन परिपत्रक क्रमांकः न्यायप्र-१०१६/प्र.क्र.४६४/पोल-५अ**
हुतात्मा राजगुरु चौक, मादाम कामा मार्ग,
मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२.
दिनांक: १९ जुलै, २०१७

**परिपत्रक :-**

पोलीस शिपाई पदावरील नियुक्तीच्या अनुषंगाने मा.महाराष्ट्र प्रशासकीय न्यायाधिकरण, मुंबई येथे मूळ अर्ज क्र.१११९/२०१६ मध्ये पोलीसअधीक्षक, रायगड यांच्याकडून दाखल करण्यात आलेले शपथपत्र पोलीस निरीक्षक दर्जाच्या अधिकाऱ्यांनी दाखल केले आहे. मा.न्यायाधिकरणाने याबाबत नापसंती व्यक्त केली असून यापुढे न्यायालयीन कामकाजामध्ये दाखल करण्यात येणारी शपथपत्रे किमान पोलीस उपअधिक्षक / सहायक पोलीस आयुक्त (गट-अ)(राजपत्रित) व त्यावरील अधिकाऱ्यांच्या स्वाक्षरीने न्यायालयात दाखल करण्याची दक्षता घेण्यात यावी. त्याचप्रमाणे दाखल करण्यात येणाऱ्या शपथपत्रामध्ये मूळ अर्जामध्ये उपस्थित केलेल्या प्रत्येक मुद्यांचा स्पष्ट खुलासा करण्यात यावा.

सदर शासन परिपत्रक महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आले असून त्याचा संकेताक २०१७०७१९१९००३७५०२९ असा आहे. हे परिपत्रक डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

V. M. Bhat

Digitally signed by V. M. Bhat
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Home Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=5f0272b97156a5d2812bad6725ca46fb2671d1da08208cfdd6677fac0afd6bf2, cn=V. M. Bhat
Date: 2017.07.19 18:56:37 +05'30'

(व्यं.मा.भट)
उप सचिव, गृह विभाग

**प्रत,**

१. पोलीस महासंचालक व महानिरीक्षक, महाराष्ट्र राज्य, मुंबई
२. सर्व पोलीस आयुक्त
३. अपर पोलीस महासंचालक, रा.रा.पो.बल, म.रा., मुंबई
४. महासमादेशक व संचालक, गृहरक्षक दल, म.रा., मुंबई
५. सर्व परिक्षेत्रिय विशेष पोलीस महानिरीक्षक
६. सर्व पोलीस अधीक्षक
७. गृह विभागातील सर्व कार्यासने.